मालेगाव बॉम्बस्फोट, दहशतवाद विरोधी पथक, गु.र.क्र.१८/२००८ मधुन उद्भवलेल्या, याचिका क्र.७३४६/२००८, व इंदोर, मध्य प्रदेश येथील विशेष प्रकरण/अपराध क्र. आरसी-०४ (एस) २०१० च्या अनुषंगाने, मा.विशेष सीबीआय न्यायालय, इंदोर यांनी, तपासी अधिकारी पोलीस निरीक्षक, श्री.राजेंद्र घुले व स.पो.नि.रमेश मोरे यांच्याविरुध्द जारी केलेल्या अटक वॉरंटविरुध्द त्यांची बाजू न्यायालयात मांडण्याकरीता ॲड.श्री.वैभव बगाडे यांची विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती बाबत व त्यांना फी अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी ०७१६/प्र.क्र.१७३/पोल-१०**
गृह विभाग, २ रा मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २३ फेब्रुवारी, २०१७

**संदर्भ** १) अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.१३८०/अपोमस/दविप/२०१६/कोर्टसेल, दिनांक २३.०६.२०१६

**शासन निर्णय:**

मालेगाव बॉम्बस्फोट, दहशतवाद विरोधी पथक, गु.र.क्र.१८/२००८ मधुन उद्भवलेल्या, याचिका क्र.७३४६/२००८ व इंदोर, मध्य प्रदेश येथील विशेष प्रकरण/अपराध क्र. आरसी-०४ (एस) २०१० च्या अनुषंगाने, मा.विशेष सीबीआय न्यायालय, इंदोर यांनी, तपासी अधिकारी पोलीस निरीक्षक, श्री.राजेंद्र घुले व स.पो.नि.रमेश मोरे यांच्याविरुध्द जारी केलेल्या अटक वॉरंटविरुध्द त्यांची बाजू न्यायालयात मांडण्याकरीता, बॉम्बे पोलीस मॅन्युअल, १९५९ च्या चाप्टर ८ च्या भाग-९ मधील नियम २९७ अंतर्गत नमूद तरतूदीनुसार, ॲड. श्री. वैभव बगाडे यांना खालीलप्रमाणे व्यवसायीक फी मंजूर करुन त्यांची विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे.

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी रूपये १०, ०००/- ( रूपये दहा हजार फक्त )

ब) प्रत्यक्षात केलेला प्रवास व निवास खर्च

३. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या परिवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही अशा अधिका-याकडून प्रमाणित करून घेण्यात यावेत. कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच याप्रकरणी ॲड. श्री. बगाडे यांना उपरोक्त फी व्यतीरिक्त अपरिणामकारक सुनावणी फी अथवा अन्य कोणत्याही प्रकारची फी वा भत्ते अनुज्ञेय असणार नाहीत.

४. यासाठी येणारा खर्च दहशतवाद विरोधी पथकाचे लेखाशिर्ष बी-१, २०५५ पोलीस - (००)(१०१), गुन्हा अन्वेषण आणि दक्षता (००) (०५), दहशतवाद विरोधी पथक (२०५५ ०५७१) - २८ व्यवसायीक व विशेष सेवा, या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र - २०१५/प्र.क्र.२१/२०१५/ विनियम, दिनांक २९ जुलै, २०१५ अन्वये, वित्तीय अधिकार नियम नियम पुस्तिका - १९७८, भाग-पहिला, उपविभाग - दोन मध्ये नव्याने समावेश केलेल्या अ.क्र.४९ नियम क्र.१६६-अ अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारानुसार तसेच, विधी व न्याय विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०३१६३३१८१६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vishnupant Joshi

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25b1cd893dfd4dc594def1c4642465ecdafbdae899f879d9b4603fe37cfb3598, cn=Arun Vishnupant Joshi
Date: 2017.03.03 16:34:33 +05'30'

(अ.वि.जोशी)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक, दक्षता विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई .
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. विधी व न्याय विभाग (कार्यासन-१४), मंत्रालय, मुंबई.
७. ॲड. श्री. वैभव बगाडे, ४/बी, चौथा माळा, हर्पल हाऊस, १४६ एन.एम. रोड, कॉमर्स हाऊस जवळ, फोर्ट, मुंबई-४०० ०२३.
८. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).